# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक-पोप्रमा-०४१७/प्र.क्र.२५०/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक ८ ऑगस्ट २०१७.

**विषय** :- पोलीस अधीक्षक, भंडारा, यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस ठाणे, आंधळगांव, येथे महिला पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्याकरिता बाल संगोपन केंद्र याचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/२७-बी/२८-बी-२/पोस्ट-आंधळगांव-संगोपन-केंद्र-बांध-भंडारा/९२/२०१७, दिनांक २२.०३.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस अधीक्षक, भंडारा, यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस ठाणे, आंधळगांव, येथे महिला पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्याकरिता बाल संगोपन केंद्र याचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप-विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, मोहाडी (जि. भंडारा), यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.२५,००,०००/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.२५,९४,६४५/-** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस अधीक्षक, भंडारा, यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस ठाणे, आंधळगांव, येथे महिला पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्याकरिता बाल संगोपन केंद्र याचे बांधकाम करण्याकरिता **रु.२५,९४,६४५/- इतक्या खर्चाच्या अंदाजास,** निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये या अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (४०७० ०२११), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९६/इमा-२, दिनांक १९.०४.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०८१६१८५११२२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.08 16:09:07 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर परिक्षेत्र, नागपूर.
३. पोलीस अधीक्षक, भंडारा.

**प्रत :-**

१) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तयार करुन दिलेल्या "General Abstract" च्या प्रतीसह).*
२) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
४) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).